महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान
वितरीत करण्याबाबत.

पंढरपूर नगर परिषद, जि. सोलापूर

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ- २०१४/प्र.क्र.२३७/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २५ मे, २०१७

**वाचा :**

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
२. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२. २००८**
३. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१२/प्र.क्र.७५४/पापु-२२, दि.५.३.२०१३**
४. **मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(प्र.व्य.स.से.)/तांशा-४/प्रक्र ११८/९९२/२०१३, दि.१०.५.२०१३**
५. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.२३७/पापु-२२, दि.१५.६.२०१५**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक ५.३.२०१३ अन्वये पंढरपूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. १,५२,८८,०००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र. ४ अन्वये सुधारणा कामांच्या एकूण रु. १,२३,७५,८००/- इतक्या निव्वळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. तांत्रिक मान्यतेच्या निव्वळ किंमतीप्रमाणे पंढरपूर नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी रु. १२,३७,५८०/- संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असुन शासन निर्णय, दि.१५.६.२०१५ अन्वये रुपये ६८,८०,०००/-इतके अनुदान पंढरपूर नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, पंढरपूर नगरपरिषद यांनी एकूण रुपये ६५,८२,५७३/

रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच, उप विभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण उपविभाग, पंढरपूर यांनी प्रमाणित केलेला मंजूर योजनेची कामे ९६.६६% पुर्ण झाली असल्याबाबतचा भौतिक प्रगती अहवाल सादर केला असुन उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. मुख्याधिकारी, पंढरपूर नगर परिषद यांच्या दि.३०.५.२०१४ च्या कार्यादेशाप्रमाणे मंजूर सुधारणा कामांसाठी रु.१,०३,४८,१९९/- किंमतीची निविदा मंजूर करण्यात आली आहे. त्याप्रमाणे योजनेची सुधारीत किंमत रु.१,१०,७२,५७३/- (शासन निर्णय, दि. ५.३.२०१३ प्रमाणे ७% ई.ॲन्ड पी. चार्जेस रु.७,२४,३७४/- मिळवून) इतकी येत असुन त्याप्रमाणे सदर योजनेस रु.९९,६५,३१६/- इतके अनुदान अनुज्ञेय आहे. पैकी, शासन निर्णय, दि.१५.६.२०१५ अन्वये रुपये ६८,८०,०००/-इतके अनुदान वितरीत करण्यात आले असल्याने उर्वरित रु.३०,८५,३१६/- अनुदान पंढरपूर नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## <u>शासन निर्णय :-</u>

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. ५.३.२०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या पंढरपूर शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी उर्वरित अनुदान रु. ३०,८५,३१६/- (रुपये तीस लाख पंचाऐंशी हजार तीनशे सोळा फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासनाकडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| पंढरपूर, जि.सोलापूर | **१,१०,७२,५७३** | **९९,६५,३१६** | **११,०७,२५७** | **११,०७,२५७** | **६८,८०,०००** | **३०,८५,३१६** |
| | | | | | **एकुण रुपये** | **३०,८५,३१६** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी

स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२५११४१३७८४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Laxman Chakre

Digitally signed by Prabhakar Laxman Chakre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fb55c284fefe73988e693f9b35dc7d7550dd83ea4655d9b78cccfa4d9d2f67eb, cn=Prabhakar Laxman Chakre
Date: 2017.05.25 13:20:02 +05'30'

(प्र.ल.चक्रे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल–१, मुंबई
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
- जिल्हाधिकारी, सोलापूर
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, पंढरपूर नगरपरिषद, जि. सोलापूर
- जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.